**दहशतवाद विरोधी पथक पो.ठाणे गु.र.क्र.०२/२०१९ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा. सत्र न्यायालय, नागपूर, मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०५१९/प्र .क्र.१९४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ** :- (१) विधी व न्याय विभाग, शासन आदेश क्र. एसपीपी.२०१९/यु.ओ.आर.२६/का-१४. दिनांक ०६ जुलै, २०१९
(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५.
(३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक १६ जून, २०१७.

**प्रस्तावना :-**

दहशतवाद विरोधी पथक पो.ठाणे गु.र.क्र.०२/२०१९ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा. सत्र न्यायालय, नागपूर, मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांची संदर्भ क्र. १ वरील विधी व न्याय विभागाच्या दिनांक ०६.०७.२०१९ च्या शासन आदेशान्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. उक्त प्रकरणी मा. सत्र न्यायालय, नागपूर, मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ येथे शासनाच्या वतीने न्यायालयीन कामकाज हाताळणा-या ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

दहशतवाद विरोधी पथक पो.ठाणे गु.र.क्र.०२/२०१९ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा. सत्र न्यायालय, नागपूर, मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**मा. सत्र न्यायालय, नागपूर, मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुणावणी फी रु. १५,०००/-(रुपये पंधरा हजार फक्त)
ब) विचारविनिमय फी रु.२,५००/- प्रति तास (किमाल प्रतिदिन रु.१०,०००/-)
क) प्रत्यक्ष प्रवास, निवास खानपान व्यवस्था खर्च

**मा. उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ, नागपूर**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुणावणी फी रु. ३०,०००/-(रुपये तीस हजार फक्त)

ब) विचारविनिमय फी रु. २,५००/- प्रति तास (किमाल प्रतिदिन रु.१०,०००/-)

क) प्रत्यक्ष प्रवास, निवास खानपान व्यवस्था खर्च

२. ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. मा. न्यायालयीन कामकाजाचे परिणाम-कारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस अधिक्षक दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. प्रशांत सत्यनाथन यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस अधिक्षकांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०१), गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००) (०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३६८/२०/व्यय-७, दि. २८/०९/२०२० अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/ प्र.क्र.२१/२०१५/ विनियम,दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१८३१५०६८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.29 18:34:42 +05'30'

( किशोर भालेराव )

**उप सचिव (विधि), गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक विभाग,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. पोलीस अधिक्षक, दहशतवाद विरोधी पथक विभाग, औंरगाबाद
४. पोलीस निरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक विभाग, नागपूर विभाग, महाराष्ट्र राज्य.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर .
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८. ॲड.श्री. प्रशांत सत्यनाथन, घर क्र.१०अ, प्लॉट क्र.२७/ब, माजी नगरसेवक अब्दुल कादीर यांच्या घरासमोर, न्यू कॉलनी, शितळामाता मंदिराजवळ, मंगळवार बाजार, सदर, नागपूर-४४० ००१.

९. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.

१०. निवड नस्ती (पोल-१०).